सार्वजनिक आरोग्य विभागाच्या अधिनस्त असलेल्या आरोग्य सेवे साठी जिल्हा नियोजन समितीकडून औषध खरेदीकरिता प्राप्त होणाऱ्या निधीमधून औषधे व साधन सामुग्री खरेदी ही स्थानिक स्तरावरुन करण्यास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१८/प्र.क्र.९४/आरोग्य-८

गोपालदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन मंत्रालय

मुंबई - ४०० ००१.

दिनांक: ०३ जुलै, २०२४

वाचा :-

१. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक: भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६.

२. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६ जुलै, २०१७.

३. महाराष्ट्र वैदयकीय वस्तू खरेदी प्राधिकरण अधिनियम २०२३, दिनांक १०.०५.२०२३

४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांचे पत्र दिनांक ०१ जुलै, २०२४.

५. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.७३/अर्थसंकल्प, दिनांक ३० जानेवारी, २०२४.

प्रस्तावना -

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या नियंत्रणाखालील आरोग्य यंत्रणांकडील औषध, यंत्रसामुग्री व तद्अनुषंगिक बाबी यांच्या खरेदीसाठी शासन अधिसूचना दिनांक १०.०५.२०२३ नुसार महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण कार्यन्वित झालेले आहे. त्यानुसार सदर खरेदी आता सदर प्राधिकरणामार्फत करणे आवश्यक आहे. तथापि, आषाढी एकादशी च्या वारी निमीत्त भाविकांना आरोग्य सेवा देण्याकरीता औषधे व साधन सामुग्री यांची तात्काळ उपाययोजना करण्याच्या दृष्टीने, वाचा अनुक्रमांक ४ येथील दि. ०१ जुलै, २०२४ रोजीच्या पत्रान्वये सहसंचालक, आरोग्य सेवा, (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेला प्रस्ताव विचारात घेऊन, त्यानुसार सन २०२४ - २५ या आर्थिक वर्षात जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांना अनुक्रमे रु. ३५.००/- लक्ष व रु. ३५०.०० लक्ष एवढा निधी स्थानिक स्तरावरुन औषधे व साधन सामुग्री खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय-

२. वर नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, सहसंचालक, आरोग्य सेवा, (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई यांनी त्यांच्या वाचा अनुक्रमांक ४ येथील दि. ०१ जुलै, २०२४ रोजीच्या

पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार स्थानिक स्तरावरुन औषधे व साधन सामुग्री खरेदी करण्यास खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

(i) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांना अनुक्रमे रु. ३५.००/- लक्ष व रु. ३५०.०० लक्ष निधी आगामी आषाढी वारी करीता येणाऱ्या भाविकांना योग्य प्रकारे आरोग्य सेवा देण्याकरीता, स्थानिक स्तरावरुन आवश्यक ती औषधे व साधन सामुग्री खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(ii) तसेच, उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे यांना वर नमूद केल्याप्रमाणे निधी खर्च करण्यासाठी, तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहे.

३. उपरोक्त औषध खरेदी करतांना, उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ०१, डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या तरतूदींचे तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय, आदेश व सूचना विचारात घेऊन सदर औषधे व साधन सामुग्री खरेदी करण्यात यावी व ती विहित वित्तीय अधिकारांच्या मर्यादेतच करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०३१७१००१८०१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2024.07.03 17:54:00 +05'30'

**( विकास तु. कदम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, वाळकेश्वर मार्ग, मलबार हिल, मुंबई-४
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा.मंत्री (सा. आ. व कु. क.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-४
४) मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई - ४०० ०२१.
६) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानभवन, मुंबई-४०० ०२१.
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) सचिव (२), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य मुंबई.
१५) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
१७) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२०) सह संचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२१) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२२) सहसंचालक (असंसर्गजन्य रोग), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२३) सहसंचालक (अतांत्रिक), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२४) सहसंचालक (तांत्रिक), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२५) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२९) लेखाधिकारी, पुणे
३०) लेखधिकारी, सोलापूर
२९) निवडनस्ती (आरोग्य-८)